गुन्हे प्रकटीकरण शाखा, गु.र.क्र.१२०/२०१३ (बांद्रा रेल्वे पो.ठा, गु.र.क्र.६३ /२०१४) मधून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणांमध्ये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड.श्री.उज्वल निकम यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी २०१४/प्र.क्र.३०/पोल-१०**

जागतिक व्यापार केंद्र, सेंटर-१, ३० वा मजला,

कफ परेड, मुंबई-४०० ००५

दिनांक : २६ ऑगस्ट, २०१४

**संदर्भ :-**

शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी-१०१४/ए.एस.४४/डी-१४, दिनांक ०४.०६.२०१४.

**शासन निर्णय :-**

गुन्हे प्रकटीकरण शाखा, गु.र.क्र.१२०/२०१३ (बांद्रा रेल्वे पो.ठा, गु.र.क्र.६३ /२०१४) मधून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाच्या वतीने कामकाज पहाण्यासाठी ॲड. श्री.उज्वल निकम यांची विधि व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक ४.०६.२०१४ च्या अधिसूचनेद्वारे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.उज्वल निकम यांना खालीलप्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रू.३०,०००/-

ब) विचार विनिमय फी (प्रतितास) - रू.८,०००/-

(कमाल मर्यादा प्रतिदिन रू.३०,०००/-)

क) हॉटेल लॉजिंग व बोर्डींग प्रतिदिन - रू.५,०००/-

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.उज्वल निकम यांना अपरिणामकारक सुनावणी फी अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर- ३१९/१४/व्यय-७, दिनांक ०२.०८.२०१४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२६११३१३२२६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Veersinh Muralidhar Patil

Digitally signed by Veersinh Muralidhar Patil
DN: CN = Veersinh Muralidhar Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home
Date: 2014.08.26 13:10:58 +05'30'

**(वी.मु.पाटील)**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई .
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. ॲड.श्री.उज्वल निकम, बॅरीस्टर निकम चौक, जळगांव
७. विधी व न्याय विभाग (का १४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती (पोल-१०).